**उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्याक विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत शिष्यवृत्तींचे वाटप करण्यासाठी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०२१/प्र.क्र.६२/का-६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : ३१ मार्च, २०२२.

वाचा -

१. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक अविवि २०११ / प्र.क्र.४४ / ११ / का-६, दिनांक १४ ऑक्टोबर, २०११.
२. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक : अविवि-२०२१/प्र.क्र.६२/का-६, दिनांक ९ जुलै, २०२१.
३. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र. १८ /तांशिस/नि.मा./(एस. जी.एस) / शा. पत्र / २०२२ /, दिनांक २४ मार्च, २०२२ चा ई-मेल संदेश.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील उच्च व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेत असलेल्या आर्थिकदृष्ट्या कमकुवत व गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजनेची अंमलबजावणी वरील संदर्भ क्र.१ येथे उल्लेखित दिनांक १४ ऑक्टोबर २०११ च्या शासन निर्णयानुसार करण्यात येत आहे.

२. उपरोक्त योजनेकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये "मागणी क्र.झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, २००-इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना-(०१)(२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहायक अनुदान (कार्यक्रम)(२२३५ ए ३३८) ३४ शिष्यवृत्या/विद्यावेतने" या लेखाशीर्षाखाली एकूण रुपये १२० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे. त्यापैकी (१) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शा.नि., अ.वि.वि., क्र.अविवि-२०२१/प्र.क्र.६२/का-६, दि.०९/०७/२०२१ अन्वये रु.५३,५१,०९,११३/- (रुपये त्रेपन्न कोटी एकावन्न लाख नऊ हजार एकशे तेरा फक्त) इतका व शासन निर्णय, अ.वि.वि., क्रमांक : अविवि-२०२१/प्र.क्र.६२/का-६, दि.२१/०३/२०२२ अन्वये रु.०६,९९,३४,७७१/- (अक्षरी रुपये सहा कोटी नव्याण्णव लाख चौतीस हजार सातशे एकाहत्तर फक्त) इतका, अशा प्रकारे एकूण रु.६०,५०,४३,८८४/- (अक्षरी रुपये साठ कोटी पन्नास लाख त्रेचाळीस हजार आठशे चौऱ्याऐंशी फक्त) इतका निधी; व (२) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना शा.नि., अ.वि.वि., क्र.अविवि-२०२१/प्र.क्र.६२(भाग-२)/का-६, दि.०९/०७/२०२१ अन्वये रु.१२,०२,९६,७००/- (रुपये बारा कोटी दोन लाख शहाण्णव हजार सातशे फक्त) इतका निधी, अशाप्रकारे एकूण रू.७२,५३,४०,५८४/- इतका निधी यापुर्वी क्षेत्रिय अधिकाऱ्यांना वितरीत करण्यात आलेला आहे.

३. आता संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील दिनांक ३० नोव्हेंबर २०२१ रोजीच्या पत्रान्वये करण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०१९-२० आणि २०२०-२१ मध्ये अर्ज केलेल्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती वाटप करण्याकरीता **रुपये ११,३६,५२,०००/-** (**अक्षरी रुपये अकरा कोटी छत्तीस लाख बावन्न हजार फक्त**) इतका निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, मुंबई यांच्या संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील दिनांक २४ मार्च, २०२२ च्या ई-मेल संदेशान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन, सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षातील उर्वरित विद्यार्थ्यांना शिष्यवृती वाटप करण्यासाठी **रुपये ११,३६,५२,०००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी छत्तीस लाख बावन्न हजार फक्त**) इतका निधी याद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०२१-२२ या वर्षातील शिष्यवृतीसाठी पात्र ठरलेल्या अल्पसंख्याक समुदायातील विद्यार्थ्यांना शिष्यवृती मंजूर करण्यासाठी सदर रक्कम संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून, संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, मुंबई या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी हे प्रस्तूत योजनेकरिता देखील आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तसेच सदर कार्यालयातील संचालक हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर शिष्यवृती वाटप त्वरीत करावयाचे असल्यामुळे या निधीचे मासिक खर्च विवरणपत्र देण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

३. याद्वारे वितरीत करण्यात आलेला निधी सन २०२१-२२ मधील शिष्यवृतीसाठी वापरण्यास याद्वारे अनुमती देण्यात येत आहे. उपरोल्लेखित लेखानुदानाच्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहित कालावधीत सादर करावे. तसेच हे अनुदान खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निर्देश / नियम / शासन निर्णय / आदेश आणि केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या निरीक्षणाचे पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय हे नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११५/२०२२/व्यय-१, दि.३१/०३/२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-३३८) ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतने या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीत अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३१२०२२३१६७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.03.31 23:31:45 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विधानसभा / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधापमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
११. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१३. महालेखापाल १ / २ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
१४. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१६. संचालक, (उच्च शिक्षण), उच्च शिक्षण संचालनालय, पुणे
१७. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१८. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई
१९. सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
२०. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवडनस्ती.